# वेगाने चालणारे गाढव

फिलीपींस की लोककथा



# वेगाने चालणारे गाढव

## फिलीपींस की लोककथा

मराठी : अश्विनी बर्वे

एका माणसाकडे खूप नारळ होते. त्यांना विकण्यासाठी त्याला शहरात जायचे होते. म्हणून त्याने सगळे नारळ आपल्या गाढवावर लादले.



शहर खूप दूर होते.



रस्त्यात त्याची भेट एका मुलाशी झाली.

"शहरात पोहचायला किती वेळ लागेल?" माणसाने विचारलं.



“जर तुम्ही भरभर गेलात तर
तुम्हांला जास्त वेळ लागेल,”
मुलगा म्हणाला.

“पण जर तुम्ही हळूहळू गेलात तर
तुम्ही लवकर पोहचाल.”



माणसाला तो मुलगा मूर्ख वाटला. त्याला वाटले की मुलगा विनाकारण बडबड करतो आहे.



“माझं गाढव भरभर चालतं,” माणूस म्हणाला.
“मी तुझ्या आधी शहरात पोहचेन.”



मग तो माणूस आपल्या गाढवाबरोबर वेगाने शहराकडे निघाला.



गाढव एवढ्या भरभर चालत होते की त्याच्या पाठीवरचे नारळ खाली पडत होते. थोड्यावेळाने गाढवाच्या पाठीवरची टोपली पूर्ण रिकामी झाली.



थोड्यावेळाने माणूस आराम करण्यासाठी थांबला.



"अरे, नाही,“ तो ओरडला.

“माझे सगळे नारळ कुठे गेले?”



मग त्या माणसाने हळूहळू एक एक नारळ उचलले. यात त्याचा भरपूर वेळ गेला.



जेव्हा माणूस शहरात पोहचला
तोपर्यंत रात्र झाली होती.





मुलगा तिथं आधीच पोहचला होता.



“बघा,” मुलगा म्हणाला. “मी म्हटलं होतं ना तुम्हांला की, कधी कधी हळू चालणं चांगलं असतं.”

मग त्या माणसाला आपल्या मूर्खपणाची जाणीव झाली.





अंत